GR-200504261722221001-0100

महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२
शासकीय माहिती अधिकारी / अपीलीय प्राधिकारी
यांच्याविरूद्धच्या तक्रारींबाबतची कार्यवाही..........

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्र.ममाअ-२००५/प्र.क्र.११/०५/५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ एप्रिल २००५

शासन परिपत्रक :-

"महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२" व त्याखालील नियमातील तरतुदींनुसार माहिती मिळण्यासाठी करण्यात येत असलेल्या अर्जांवर संबंधित शासकीय माहिती अधिकाऱ्याने १५ दिवसांत (आवश्यक तेथे वाढीव कालावधीत) निर्णय घेणे आवश्यक आहे (कलम ६), तसेच संबंधित शासकीय माहिती अधिकाऱ्याच्या निर्णयाने वा निर्णयाअभावी व्यथित होऊन केल्या जाणाऱ्या अपील अर्जांवर ३० दिवसांत (आवश्यक तेथे वाढीव कालावधीत) निर्णय घेणे आवश्यक आहे (कलम ११). त्याचप्रमाणे कसूरदार शासकीय माहिती अधिकाऱ्यांविरूद्ध दंडात्मक/शिस्तभंगविषयक कारवाई करण्याची तरतूदही या अधिनियमात करण्यात आलेली आहे (कलम १२) आणि कसूरदार अपीलीय प्राधिकारी "कर्तव्यातील कसूर" या कारणाकरिता शिस्तभंग कारवाईस पात्र असतील असेही शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.ममाअ-२००४/प्र.क्र.३४/०४/५, दिनांक ६ जुलै, २००४ द्वारे स्पष्ट करण्यात आलेले आहे.

शासनाकडे वेळोवेळी अर्ज करून शासकीय माहिती अधिकाऱ्यांकडून कसूर झालेली असूनही दंडात्मक कारवाई होत नसल्याचे तसेच अपिलीय प्राधिकाऱ्यांकडून विहित मुदतीत अपीलांवर निर्णय घेतले जात नसल्याचे निदर्शनास आणले जात आहे. अशा तक्रारीची दखल घेऊन संबंधितांविरूद्ध योग्य ती कारवाई करण्याचे अधिकार संबंधित सक्षम प्राधिकारी यांना आहेत. तथापि, सर्वसामान्य नागरिकांना सर्व सक्षम प्राधिकाऱ्यांची माहिती उपलब्ध करून देण्याची कार्यवाही अद्याप पूर्ण व्हावयाची आहे. त्यामुळे अशा बहुतांश तक्रारी सामान्य प्रशासन विभाग किंवा मुख्य सचिवांकडे प्राप्त होत आहेत. त्यासंदर्भात आता खालीलप्रमाणे कार्यपद्धती अवलंबिण्यात यावी असा निर्णय शासनाने घेतला आहे.

सामान्य प्रशासन विभाग अथवा मुख्य सचिवांकडे प्राप्त होणारे अर्ज सोबतच्या पत्र 'अ' अनुसार कळवून संबंधित प्रशासकीय विभागाकडे हस्तांतरित करण्यात येतील. संबंधित विभागाने अशा तक्रारीसंबंधात सोबत जोडलेल्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यानुसार नोटीस पाठवून संबंधित शासकीय माहिती अधिकारी/ अपिलीय प्राधिकारी यांचेकडून खुलासा मागविण्याची कार्यवाही विनाविलंब करावी. खुलासा प्राप्त झाल्यावर त्याची छाननी करण्यात यावी व त्याआधारे संबंधित माहिती अधिकारी/अपिलीय प्राधिकारी दोषी ठरतात वा नाही

(कृ.मा.प.)

याबद्दलचा निष्कर्ष काढावा आणि दोषी अधिकाऱ्यांविरूद्ध दंडनीय कारवाई/शिस्तभंगाची कारवाई करण्याची कार्यवाही करावी. मात्र तसे करताना संबंधित अधिकाऱ्याला नैसर्गिक न्यायाच्या तत्वानुसार आपली बाजू मांडण्याची वाजवी संधी देऊन अशी कार्यवाही करण्यात यावी.

असा निर्णय झाल्यावर अर्जदारांना योग्य ते अंतिम उत्तर पाठविण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वंदना कृष्णा)
शासनाचे सचिव

सोबत :- १) अर्जदारांना पाठवावयाच्या पत्राचा नमुना (प्रपत्र 'अ')
२) नोटीसचा नमुना (प्रपत्र 'ब')

प्रत :-

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) मुख्य सचिव,
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/सचिव,
*७) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
*८) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
*९) महाप्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
*१०) महाप्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
*११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१२) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*१३) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी / जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) सर्व महानगरपालिका आयुक्त,
१७) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख,
१८) सर्व मंत्रालयीन विभाग, व सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
*१९) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे-४११ ००७
*२०) राज्य स्तरीय परिषदेचे सर्व सदस्य.
२१) निवड नस्ती. (२ प्रती)

* (पत्राने)

प्रपत्र 'अ'

महाराष्ट्र शासन

दूरध्वनी क्र. : २२७९३११२

क्रमांक : ममाअ-     /     /५
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :

प्रति,

श्री./श्रीम.

________________

________________

________________

विषय : शासकीय माहिती अधिकारी /अपिलीय प्राधिकारी यांचेकडून माहिती पुरविण्याबाबतच्या कार्यवाहीसंदर्भातील तक्रार......

महोदय/महोदया,

वरील विषयाबाबतचा आपला दि.____________चा तक्रार अर्ज मिळाला. त्या तक्रारीचा संबंध ________________________ या विभागाशी असल्याचे दिसून येते. त्यामुळे आपला अर्ज योग्य ती कार्यवाही करुन आपणास त्यानुसार उत्तर पाठविण्याच्या विनंतीसह त्या विभागाकडे हस्तांतरित करण्यात आला आहे. यासंबंधातील पुढील पत्रव्यवहार आवश्यकतेनुसार कृपया त्या विभागाकडे परस्पर करण्यात यावा, ही विनंती.

आपला/आपली,

(          )
कक्ष अधिकारी
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन ५

प्रतिलिपी :

श्री./श्रीमती ______________________ यांच्या दिनांक ____________च्या मूळ अर्जा सहपत्रांसह, शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.: ममाअ-२००५/९१/०५/५, दिनांक ११ /४/२००५ मधील सूचनांनुसार आवश्यक ती कार्यवाही करुन अर्जदारांना त्यानुसार उत्तर पाठविण्याच्या विनंतीसह सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव ____________________ विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे सादर अग्रेषित.

प्रपत्र 'ब'

गोपनीय

क्रमांक :

दूरध्वनी क्र.

विस्तारित क्र. :

____________________ विभाग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :

## "महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२" च्या अमलबजावणीत कसूर करणाऱ्या शासकीय माहिती अधिकारी /अपीलीय प्राधिकाऱ्यांविरूद्ध कारवाईसंबंधी नोटीस

## नोटीस

श्री. ______________________________ तथा शासकीय माहिती अधिकारी /अपीलीय प्राधिकारी यांचे लक्ष "महाराष्ट्र माहितीचा अधिकार अधिनियम, २००२" मधील कलम ६/११ तसेच "महाराष्ट्र माहितीचा अधिकार नियम, २००२" मधील नियम ६/७ मधील तरतुदी आणि शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र.ममाअ-२००४/प्र.क्र.३४/०४/५, दिनांक २५ मे २००४ व शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.ममाअ-२००४/प्र.क्र.३४/०४/५, दिनांक ६ जुलै २००४ तसेच शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.ममाअ-२००४/प्र.क्र.६६/०४/५, दिनांक २२ जून २००४ मधील तरतुदींकडे वेधण्यात येत आहे.

२. वरील तरतुदींनुसार शासकीय माहिती अधिकाऱ्याने /अपीलीय प्राधिकाऱ्याने त्याच्याकडे प्राप्त झालेल्या माहिती मागणीबाबतच्या अर्जावर/अपीलावर विहित मुदतीत निर्णय घेऊन तो संबंधित अर्जदार यांना कळविणे बंधनकारक असून यात कसूर करणारे अधिकारी आर्थिक दंड तसेच कर्तव्यातील कसूरीसाठी शिस्तभंगाच्या कारवाईसही पात्र ठरतात.

३. शासनाच्या असे निदर्शनास आणण्यात आले आहे की, श्री.____________________ तथा शासकीय माहिती अधिकारी/अपीलीय प्राधिकारी यांनी त्यांचेकडे प्राप्त झालेल्या श्री.__________________ यांच्या दिनांक ________ च्या अर्जावर/ अपीलावर विहित मुदतीत कार्यवाही न करून उपरोक्त तरतुदींचा भंग केला आहे व ते वरीलप्रमाणे कारवाईस पात्र ठरतात. याबाबतची वस्तुस्थिती जाणून घेण्यासाठी आता या नोटीसद्वारे असे कळविण्यात येत आहे की, याबाबतीत त्यांना आपली बाजू मांडावयाची असल्यास त्यांनी त्यांचे याबाबतचे लेखी स्पष्टीकरण (जरूर तर आवश्यक त्या कागदपत्रांच्या प्रती जोडून) निम्न स्वाक्षरीकाराकडे ही नोटीस प्राप्त झाल्यापासून १० दिवसाच्या आत सादर करावे. अन्यथा आपणास यासंबंधात त्यांना काहीही सांगावयाचे नाही असे गृहीत धरून एकतर्फी कार्यवाही करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

(                    )

शासनाचे सचिव/प्रधान सचिव/अमुस

प्रति

श्री. ______________तथा शासकीय माहिती अधिकारी/ अपीलीय प्राधिकारी

कार्यालयाचा पत्ता